**आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०२४-२५ या वर्षासाठी केंद्र पुरस्कृत कृषी उन्नत्ती योजना-राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य-कॅफेटेरीया या योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत.**
**(केंद्र हिस्सा - २४०१ ए ७४४)**
**(राज्य हिस्सा - २४०१ ए ७५३)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.७/कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०२ जुलै, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४ /प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई यांची नस्ती क्र..राकृवि-०६२४/प्र.क्र. १३९/१४-अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत कृषी उन्नत्ती योजना-राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य-कॅफेटेरीया या योजनेसाठी सन २०२४-२५ या वर्षातील पहिल्या हप्त्यासाठी प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रु.३.९६ कोटी व समरुप राज्य हिस्सा रु.२.६४ कोटी असा एकूण रु.६.६० कोटी इतका निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींतून वितरीत करण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.२ अन्वये कृषी व पदुम विभागाने सादर केला होता.

उपरोक्त प्रस्तावास मिळालेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती :-

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. टी-५ अंतर्गत मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन या मुख्य लेखाशीर्षांतर्गत केंद्र पुरस्कृत कृषी उन्नत्ती योजना-राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य-कॅफेटेरीया या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून केंद्र हिस्सा रु.३.९६ कोटी व समरुप राज्य हिस्सा रु.२.६४ कोटी असा एकूण रु.६.६० कोटी इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.कोटीत)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | या शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य- कॅफेटेरीया | २४०१ ए ७४४ केंद्र हिस्सा (६० %) | ३३, अर्थसहाय्य | २१.०० | ३.९६ |
| | २४०१ ए ७५३ राज्य हिस्सा (४० %) | | १४.०० | २.६४ |
| **एकूण** | | | **३५.००** | **६.६०** |

२. उपरोक्तप्रमाणे **रु.६.६० लाख (अक्षरी रुपये सहा कोटी साठ लाख फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, कृषी विभाग** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४ च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर योजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत या विभागास सादर करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे दि.०१.०४.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन व वित्त विभागाने प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०७०११२१०४९१७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.07.03 14:50:52 +05'30'

**( राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प-१९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (कार्या-९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.